जिल्हा सामान्य रुग्णालय, ठाणे रुग्णालयाचे स्थलांतर करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## सार्वजनिक आरोग्य विभाग
## शासन निर्णय क्रमांकः जिरुठा-२०१८/प्र.क्र. ५३७/आरोग्य ३अ

१० वा मजला संकुल इमारत
जी.टी.रुग्णालय आवार, मुंबई - ४०००01
दिनांक: ०७ फेब्रुवारी, २०१९

**वाचा -**

१) शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण - २०१५/ प्र. क्र. ४०९/ आरोग्य-३अ, दि. १७ जुलै, २०१८

२) सहाय्यक संचालक रुग्णालय (राज्यस्तर) आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र. संआसे/कक्ष-३/टे-७/जिल्हा रुग्णालय ठाणे हस्तांतरण/ठामं-/जा.क्र. /१८ दिनांकः- १९/१२/२०१८

३) शासन सार्वजनिक आरोग्य विभाग पत्र क्र. बैठक-२०१८/प्र.क्र. ४६३/आ३अ दिनांक ०२ जानेवारी, २०१९.

**प्रस्तावना -**

ठाणे येथील जिल्हा सामान्य रुग्णालयाची इमारत जुनी झाल्याने तेथील धोकादायक इमारती पाडण्यापूर्वी तेथील वॉर्ड/कक्ष अन्यत्र स्थलांतरीत करुन जिल्हा रुग्णालय नजीकच्या परिसरात कार्यान्वित ठेवण्यास मान्यता देण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. यासंदर्भात पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

## शासन निर्णय-

जिल्हा सामान्य रुग्णालय ठाणे येथील धोकादायक इमारती पाडण्यापूर्वी सामान्य रुग्णालयातील वार्ड/कक्ष स्थंलातंरीत करण्यास आणि सदर रुग्णालय / रुग्णालयाचा भाग नवीन जागेमध्ये स्थलांतरीत करण्यास व नवीन जागेमध्ये जिल्हा रुग्णालय/रुग्णालयचा भाग कार्यन्वित करण्यास पुढीलप्रमाणे मान्यता देण्यात येत आहे.

| अ. क्र | सध्याच्या इमारतीमधील कक्षाचा/विभागाचा तपशिल | स्थलांतरीत करावयाचे ठिकाण/इमारत |
|---|---|---|
| १ | जुन्या ओ.पी.डी.इमारतीमधील लेबर वार्ड, पी.एन.सी.यु. कक्ष | प्रादेशिक मनोरुग्णालय, ठाणे आवारातील नव्याने बांधलेल्या आरोग्य व कुंटूंब कल्याण प्रशिक्षण केंद्राच्या इमारतीमध्ये |

| | | |
|---|---|---|
| २ | नव्या ओ.पी.डी. इमारतीमधील गयनिक शस्त्रक्रिया, गायनिक ओ.पी.डी.लसीकरण विभाग | प्रादेशिक मनोरुग्णालय, ठाणे आवारातील नव्याने बांधलेल्या आरोग्य व कुंटूंब कल्याण प्रशिक्षण केंद्राच्या इमारतीमध्ये |
| ३ | नेत्र विभाग इमारतीमधील लहान मुलांचा कक्ष,एन.आर.सी.विभाग | प्रादेशिक मनोरुग्णालय, ठाणे आवारातील नव्याने बांधलेल्या आरोग्य व कुंटूंब कल्याण प्रशिक्षण केंद्राच्या इमारतीमध्ये |
| ४ | जुन्या ओ.पी.डी.इमारतीमधील जिल्हा शल्यचिकित्सक, अतिरिक्त जिल्हा शल्यचिकित्सक यांची दालने | प्रादेशिक मनोरुग्णालय, ठाणे आवारातील नव्याने बांधलेल्या प्रशिक्षण केंद्राच्या वसतीगृहाच्या इमारतीमध्ये |
| ५ | नवीन ओ.पी.डी. इमारतीमधील सोनोग्राफी विभाग, रक्तपेढी विभाग | प्रादेशिक मनोरुग्णालय, ठाणे आवारातील नव्याने बांधलेल्या प्रशिक्षण केंद्राच्या वसतीगृहाच्या इमारतीमध्ये |
| ६ | ए.आर.टी.विभाग | प्रादेशिक मनोरुग्णालय, ठाणे आवारातील नव्याने बांधलेल्या प्रशिक्षण केंद्राच्या वसतीगृहाच्या इमारतीमध्ये किंवा जिल्हा रुग्णालयाच्या आवारातील निवासस्थानांच्या चाळीमध्ये |
| ७ | नेत्र विभाग | १. उपजिल्हा रुग्णालय, भिवंडी येथे किंवा<br>२. प्रादेशिक मनोरुग्णालय, ठाणे आवारातील नव्याने बांधलेल्या प्रशिक्षण केंद्राच्या वसतीगृहाच्या इमारतीमध्ये किंवा<br>३. ठाणे महानगर पालिकेच्या रोझा गार्डन येथील आरोग्य केंद्राच्या इमारतीमध्ये |
| ८ | डी.आय.सी.विभाग | प्रादेशिक मनोरुग्णालय, ठाणे आवारातील नव्याने बांधलेल्या प्रशिक्षण केंद्राच्या वसतीगृहाच्या इमारतीमध्ये |
| ९ | नवीन ओ.पी.डी.इमारतीमधील इ.सी.जी.विभाग | जिल्हा रुग्णालयाच्या आवारातील प्रथम टप्यात न पाडावयाच्या अपघात विभागाच्या इमारतीमध्ये किंवा जिल्हा रुग्णालयाच्या आवारातील निवासस्थानांच्या चाळीमध्ये |

| | | |
|---|---|---|
| १० | नवीन ओ.पी.डी.इमारतीमधील केसपेपर विभाग व औषध वितरण विभाग | जिल्हा रुग्णालयाच्या आवारातील प्रथम टप्यात न पाडावयाच्या अपघात विभागाच्या इमारतीच्या कॉरीडॉरमध्ये आवारातील निवासस्थानांच्या चाळीमध्ये |
| ११ | प्रयोगशाळा | जिल्हा रुग्णालयाच्या आवारातील प्रथम टप्यात न पाडावयाच्या अपघात विभागाच्या इमारतीमध्ये किंवा प्रादेशिक मनोरुग्णालय ठाणे आवारातील नव्याने बांधलेल्या प्रशिक्षण केंद्राच्या वसतीगृहाच्या इमारतीमध्ये |
| १२ | नवीन ओ.पी.डी. इमारतीमधील दंत व श्रवण विभाग, हिमॅटॉलॉजी विभाग व मानसोपचार ओ.पी.डी.आयुष विभाग स्वाईन फल्यु विभाग | जिल्हा रुग्णालयाच्या आवारातील प्रथम टप्यात न पाडावयाचे ॲन्सीलरी इमारतीमध्ये उपलब्ध निवासस्थानांमध्ये |
| १३ | अपघात विभाग इमारतीमधील पुरुष व स्त्री जळीत कक्ष | दोन वेगवेगळे विभाग असून ते एकत्रित करुन आहे तेथेच कार्यरत ठेवणे |
| १४ | नवीन ओ.पी.डी. इमारतीमधील पुरुष शस्त्रक्रिया विभाग पुरुष आस्थिव्यंग विभाग व स्त्री मेडीकल विभाग | दोन स्वतंत्र जळीत कक्ष एकत्रित केल्यानंतर उपलब्ध झालेल्या रिक्त कक्षामध्ये व त्याच इमारतीच्या टेरेस वर शेडचे बांधकाम करुन तेथे स्थलांतरीत करणे. |
| १५ | नवीन ओ.पी.डी.इमारतीमधील पुरुष शस्त्रक्रिया विभाग पुरुष आस्थिव्यंग विभाग | अपघात विभाग इमारतीमधील हिमॅटॉलॉजी विभाग स्थलांतरीत केल्यावर त्या जागी व टेरेस वर शेड बांधून त्या जागी |
| १६ | नवीन ओ.पी.डी.इमारतीमधील शस्त्रक्रियागृह | अपघात विभाग इमारतीमधील शस्त्रक्रियागृहामध्ये |
| १७ | जिल्हा क्षयरोग कार्यालय व क्षयरोग रुग्ण पुरुष व स्त्री कक्ष | जिल्हा रुग्णालयाच्या आवारातील निवासस्थांनाच्या चाळीमध्ये किंवा आवारातील मोकळया जागी शेडचे बांधकाम करुन त्यामध्ये |
| १८ | नवीन ओ.पी.डी.इमारतीमधील क्ष किरण विभाग | जिल्हा रुग्णालयाच्या आवारातील प्रथम टप्यात न पाडावयाच्या अपघात विभागाच्या इमारतीमध्ये |
| १९ | अपघात विभागातील टेलीमेडीसीन व रा.आ.अ.विभाग | जिल्हा रुग्णालयाच्या आवारातील प्रथम टप्यात न पाडावयाच्या प्रशासकीय कार्यालयाच्या |

| | | |
|---|---|---|
| | | इमारतीमध्ये |
| २० | नर्सिग प्रशिक्षण केंद्र | सामान्य रुग्णालय, मालवणी, मालाड येथे किंवा कामा व आल्ब्लेस स्त्री रुग्णालय मुंबई येथे स्थलांतरीत करणे |

जिल्हा सामान्य रुग्णालय, ठाणे येथील धोकादायक इमारती पाडून तेथील बांधीत होणारे वार्ड/कक्ष वरील प्रमाणे स्थंलातरीत करण्याकरीता लागणा-या खर्चाचे अंदाजपत्रकास स्वंतत्र पणे प्रशासकीय मान्यता देण्यात येईल.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०११८११३८०३९२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shamraoji Kaurte

Digitally signed by Rajendra Shamraoji Kaurte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ed4c738df60ac2ac776b9e2481f77ad50aba9dc28bb31a482e03c7ee7b6f64d8, serialNumber=7caa550613a8c4cb7c593368faa24e20d6f8985f510118e6fc1af8b04a443ee8, cn=Rajendra Shamraoji Kaurte
Date: 2019.02.28 11:57:31 +05'30'

**रा.शा.कौरते**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा. मुख्यमंत्री सचिवालय मंत्रालय, मुंबई.
२. मा. विरोधी पक्ष नेते महाराष्ट्र विधान सभा/विधान परिषद विधान मंडळ सचिवालय, मुंबई.
३. मा. मंत्री, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय मुंबई.
४. महालेखापाल (लेखा परीक्षा)/(लेखा अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
५. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
६. संचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे.
७. उप संचालक, आरोग्य सेवा, मुंबई मंडळ, ठाणे.
८. जिल्हा आरोग्य अधिकारी, ठाणे
९. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे
१०. वित्त विभाग (कोषागारे/प्रशासन ५), मंत्रालय, मुंबई.
११. अवर सचिव (अर्थसंकल्प), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (कार्यासन आरोग्य-३अ)